**महाराष्ट्र औद्योगिक धोरण-२०१३ सोबतच्या "अनुसूची - अ" येथे दर्शविलेल्या "एकात्मिक औद्योगिक क्षेत्र" विकसित करण्यासंबंधी धोरणामध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र. मऔधो -२०१६/प्र.क्र. २०९/ उद्योग-२,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १५ फेब्रुवारी, २०१८

**प्रस्तावना:-**

केंद्र सरकारने विशेष आर्थिक क्षेत्र अधिनियम, २००५ व विशेष आर्थिक क्षेत्र नियम, २००६ लागू केले असून, त्या अंतर्गत काही विशेष आर्थिक क्षेत्रे अधिसूचित केलेली आहेत. बाजारपेठेमध्ये असलेली प्रतिकूल परिस्थिती तसेच अशा विशेष आर्थिक क्षेत्रांसाठी विविध करांमध्ये कमी करण्यात आलेल्या प्रोत्साहनात्मक बाबीमुळे महाराष्ट्र राज्यात मंजूर करण्यात आलेले/अधिसूचित करण्यात आलेली विशेष आर्थिक क्षेत्रे अधिसूचना रद्द अथवा मागे घेण्यात आली आहेत. भविष्यात आणखी काही विशेष आर्थिक क्षेत्रे प्रस्ताव अधिसूचना रद्द अथवा मागे घेण्याची शक्यता आहे. अशा परिस्थितीमध्ये राज्य शासन अशा निर्णयाप्रत आले आहे की, या भागांचा नियोजनबद्ध विकास आणि औद्योगिकरणास चालना देण्यासाठी एक योग्य असे निर्गमन धोरण (Exit Policy) तयार करणे आवश्यक होते.

२. ही बाब विचारात घेऊन अधिसूचना रद्द केलेल्या / प्रस्ताव मागे घेण्यात आलेल्या विशेष आर्थिक क्षेत्रांच्या जमीनीचा वापर कसा करता येईल याबाबतच्या धोरणाचा मसुदा तयार करण्यासाठी शासनाने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.आयआयपॉलिसी-२०१०/प्र.क्र.७६८/२०१०/उद्योग-२, दि.२०.७.२०१२ नुसार संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती स्थापन केली. समितीने सर्व संबंधितांशी सखोल चर्चा करुन तसेच समितीच्या बैठकांमध्ये विविध विषयांवर अभ्यास करुन उक्त विषयासंबंधीचा अहवाल शासनास दिनांक २३.११.२०१२ रोजी सादर केला आहे. या समितीच्या शिफारशी तपासून घेतल्यानंतर सदर अहवाल काही बदलांसह स्वीकारला आहे. अंतिमत: एकात्मिक औद्योगिक क्षेत्रे विकसित करण्यासंबधी धोरण स्वीकारण्यात आले होते.

३. औद्योगिकरणासाठी उपलब्ध करुन दिलेल्या क्षेत्राचा वापर व त्यावरील परतावा हा जागतिक व्यापारातील चढ/उतारावर तसेच तेजी/मंदीवर अवलंबून असतो. शिवाय उत्पादन प्रक्रियेत जमिनीचे मूल्य एका विशिष्ट रकमेपेक्षा जास्त वाढविता येत नाही. त्यामुळे रहिवासी व वाणिज्यीक आवारांच्या निर्मितीतून विकासक आर्थिक समतोल साधू शकतो. संयुक्त उपक्रम विशेष आर्थिक क्षेत्रावर एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करण्यासाठी, त्यांना प्राप्त होणाऱ्या 'औद्योगिक वापरासाठी' ६० टक्के व पूरक बाबींच्या वापरासाठी ४० टक्के या जमिनीच्या वापरामधील प्रमाणात बदल करुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या नियमित औद्योगिक वसाहतीप्रमाणे अनुज्ञेय असलेला ८०: २० असा जमिनीचा वापर निश्चित करण्यात यावा. तसेच महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण -२०१३ सोबतचे "अनुसची- अ" येथे नमूद केलेल्या एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करण्यासंबंधी धोरणामध्ये पात्रतेसंदर्भात काही निकष निश्चित केले आहेत. त्यापैकी "सदर धोरण संबंधित विशेष नियोजन प्राधिकाऱ्याच्या विकास नियंत्रण नियमावलीमध्ये समाविष्ट करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर

रचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७ (१अअ) नुसार जाहीर सूचना प्रसिध्द करण्याच्या तारखेपर्यंत (नियत दिनांक ) तसेच वरील वर्गवारीतील जे विशेष आर्थिक क्षेत्र सदर नियत दिनांकानंतर ६ महिन्यांच्या आत ना-अधिसूचीत किंवा औपचारिक मंजूरीनंतर मागे घेण्यात येतील अशी क्षेत्रे "एकात्मिक औद्योगिक क्षेत्रे" म्हणून विकसीत करण्यास पात्र राहतील." या तरतूदीमुळे काही विशेष आर्थिक क्षेत्र ना-अधिसूचीत होऊन / औपचारीक मंजूरी नंतर मागे घेऊन, देखील नियत दिनांकापर्यंत उक्त कार्यवाही न झाल्याने ते अपात्र ठरण्याची शक्यता आहे. त्यामुळे सदर धोरण अस्तित्त्वात आणण्यामागील अंतस्थ हेतू साध्य होत नसल्याने उक्त "नियत दिनांक" संबंधीत पात्रतेच्या निकष पूर्णत: काढून टाकण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्य शासन अथवा राज्य शासनाचे उपक्रम/ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ / सिडको यांचेकडील जमीनीवर स्थापित विशेष आर्थिक क्षेत्रावर एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करण्यासंदर्भात शासनाकडून नव्याने पुढीलप्रमाणे धोरण निश्चित करण्यात येत आहे.

१. राज्य शासन अथवा राज्य शासनाचे उपक्रम / म.औ.वि.म./सिडको यांचेकडील जमीनीवर स्थापित विशेष आर्थिक क्षेत्रावर एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करावयाचे झाल्यास, औद्योगिक वापरासाठी' ६० टक्के व पूरक बाबींच्या वापरासाठी ४० टक्के या जमिनीच्या वापर अनुज्ञेय होता. या जमिनीच्या वापराच्या प्रमाणात बदल करुन अशा क्षेत्रावरील एकात्मिक औद्योगिक क्षेत्राच्या विकासनासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या विकास नियंत्रण नियमावलीनुसार अनुज्ञेय असलेला किमान ८० टक्के औद्योगिक वापरासाठी व कमाल २० टक्के वापर पूरक बाबींसाठी असा जमिनीचा वापर निश्चित करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्राचे औद्योगिक धोरण २०१३ सोबतचे "अनुसची- अ" येथे नमूद केलेल्या एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करण्यासंबंधी धोरणामध्ये पात्रतेसंदर्भात काही निकष निश्चित केले आहेत. त्यापैकी "सदर धोरण संबंधित विशेष नियोजन प्राधिकाऱ्याच्या विकास नियमावलीमध्ये समाविष्ट करण्यासाठी महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७ (१अअ) नुसार जाहीर सूचना प्रसिध्द करण्याच्या तारखेपर्यंत (नियत दिनांक) तसेच वरील वर्गवारीतील जे विशेष आर्थिक क्षेत्र सदर नियत दिनांकानंतर ६ महिन्यांच्या आत ना-अधिसूचीत किंवा औपचारिक मंजूरीनंतर मागे घेण्यात येतील अशी क्षेत्रे "एकात्मिक औद्योगिक क्षेत्रे" म्हणून विकसीत करण्यास पात्र राहतील."

उपरोक्त तरतूदीमुळे काही विशेष आर्थिक क्षेत्र ना-अधिसूचीत होऊन / औपचारीक मंजूरी नंतर मागे घेऊन देखील नियत दिनांकापर्यंत उक्त कार्यवाही न झाल्याने ते अपात्र ठरण्याची शक्यता आहे. त्यामुळे सदर धोरण अस्तित्त्वात आणण्यामागील अंतस्थ हेतू साध्य होत नसल्याने उक्त "नियत दिनांक" संबंधीत निकष पूर्णत: काढून टाकण्यात येत आहेत.

३. खेड इकॉनॉमिक इन्फ्रास्ट्रक्चर प्रा.लि.(KEIPL) यांचेकडून प्रकल्पबाधित शेतकऱ्यांची कंपनी खेड डेव्हलपर्स लि. (KDL) यांना हस्तांतरीत होणाऱ्या १५% विकसित भूखंडाच्या क्षेत्रासाठी आकारल्या जाणाऱ्या मुद्रांक शुल्काच्या रकमेस मुंबई मुद्रांक अधिनियम कलम (९) नुसार लोकहितास्तव माफी देण्यात येत आहे.

४. खेड इकॉनॉमिक इन्फ्रास्ट्रक्चर प्रा.लि.(KEIPL) या कंपनीस विना-अधिसूचित झालेल्या क्षेत्रामध्ये एकात्मिक औद्योगिक क्षेत्र (IIA) स्थापित करण्यासाठी तत्वत: मान्यता देण्यात येत आहे. नवी मुंबई विशेष आर्थिक

क्षेत्र संदर्भात मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील नियुक्त उच्चाधिकार समिती खेड इकॉनॉमिक इन्फ्रास्ट्रक्चर प्रा.लि.(KEIPL) च्या एकात्मिक औद्योगिक क्षेत्रा संदर्भात देखील पुढील कार्यपध्दती निश्चित करेल.

५. मा. मंत्रीमंडळाने दिलेली मान्यता विचारात घेऊन, या शासन निर्णयातील संबंधित तरतुदींच्या संदर्भात मंत्रालयीन विविध विभागाकडून स्वतंत्रपणे शासन निर्णय / अधिसूचना निर्गमित करणे अपेक्षित आहे. त्या संबंधित यादी परिशिष्ट-अ मध्ये नमूद करण्यात आली असून, स्तंभ २ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयाच्या परिच्छेदामधील निर्णय विचारात घेऊन स्तंभ -४ मध्ये नमूद केलेल्या विभागाकडून तत्संबधी आदेश / मार्गदर्शक तत्वे / शासन निर्णय / विकास नियंत्रण नियमावलीत सुधारणा अधिसूचना निर्गमित करण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.

६. या शासन निर्णयानुसार सर्व संबंधित विभागांनी आवश्यक ते आदेश अधिसूचना त्वरीत निर्गमित कराव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०२१४१८०७३४२५१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Industry, Energy and Labour Department, ou=Government Of Maharashtra, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2018.02.15 17:43:24 +05'30'

**( संजय देगांवकर )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
४. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१०. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
११. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
१३. अपर मुख्य सचिव, नियोजन, मंत्रालय, मुंबई.

१४. प्रधान सचिव, नगर विकास (नवि-१), मंत्रालय, मुंबई
१५. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव,/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, / औरंगाबाद विभाग/ पुणे विभाग/ नाशिक विभाग/ अमरवती विभाग नाशिक विभाग.
१८. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत मुंबई
१९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
२०. सर्व जिल्हाधिकारी.
२१. उद्योग ऊर्जा व कामगार विभागाच्या नियंत्रणाखालील महामंडळे / शासकीय उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक / मुख्य कार्यकारी अधिकारी.
२२. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
२३. उद्योग विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव/कक्ष अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
२४. उद्योग सह संचालक/ अधिक्षकीय उद्योग अधिकारी, मुंबई प्राधिकरण विभाग / कोकण विभाग/ पुणे/ नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपूर
२५. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व)
२६. निवडनस्ती (उद्योग-२).

**शासन निर्णय क्रमांक मऔधो-२०१६/(प्र.क्र.२०९)/उद्योग-२, दिनांक : १५ फेब्रुवारी, २०१८ सोबतचे विवरणपत्र**

| परिशिष्ट - "अ" | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **सोबतच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक** | **कार्यवाही विषय** | **कार्यवाही अपेक्षित संबंधित विभागाचे नाव** |
| १ | १ | राज्य शासन अथवा उपक्रम / म.औ.वि.म./सिडको यांचेकडील जमीनीवर स्थापित विशेष आर्थिक क्षेत्रावर एकात्मिक औद्योगिक क्षेत्र विकसित करण्यासाठी जमिनीच्या वापरात ६०:४० (औद्योगिक : पूरक) या प्रमाणात बदल करुन (औद्योगिक: पूरक) किमान ८०:२० असा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या विकास नियंत्रण नियमावलीनुसार जमिनीच्या वापरात बदल करणे. | **नगर विकास विभाग (नवि-१)** |
| २ | ३ | KDLकंपनीस मुद्रांक शुल्क माफी. | **महसूल व वन विभाग** |

**Maharashtra Industrial Policy-2013 Schedule-A**

Modifications for development of Integrated Industrial Area

**Introduction :**

The Government of India enacted the Special Economic Zone Act, 2005 and made the Special Economic Zone Rules, 2006 thereunder. A number of SEZs were notified under this Act in Maharashtra. However quite a few notified SEZs have been either denotified or withdrawn on account of unfavorable market conditions as well as reduced incentive regime for the SEZs and there is every possibility of more SEZs, opting to be de-notified or withdrawn in future. The State Government is of the opinion that under these circumstances an appropriate exit policy must be introduced which would facilitate both industrialization and planned development of such areas. Looking to this aspect, the Government vide Resolution No IIPolicy -2010/CR-768/2010/IND-2, Dated 20/7/2012 appointed Committee under the Chairmanship of the Director of Town Planning, Maharashtra State, Pune to look into the above matter and draft policy to utilised the lands under the de-notified /withdrawn SEZ's. The Committee,after considerable deliberation and meetings with the concerned, submitted its reports to the Government on 23/11/2012. The recommendation made by the said Committee have been duly examined and have been accepted with certain modifications.

The use and returns of the area provided for industrialization depend on the global trade fluctuations / acceleration / speed / slowdown. Moreover, the value of land in the production process cannot be increased beyond a particular amount. Therefore, the developers can maintain financial balance through the creation of residential and commercial spaces. In order to develop an integrated industrial area on a joint venture special economic zone, use of land as 60 percent for the 'industrial uses' and 40 percent for the use of supplementary items should be changed to 80:20 as permissible for the regular industrial estates of Maharashtra Industrial Development Corporation. Also, some of eligibility criteria were set out regarding the policy of developing integrated industrial areas as mentioned in "Schedule-A" of Maharashtra Industrial Policy-2013.

The Special Economic Zones (SEZs), that stand withdrawn or de-notified on the date of Notification u/s 37(IAA) of the MRTP Act 1966 that shall be published by the Govt. to incorporate the elements of this policy into the DCRs of the concerned Special Planning Authority, (hereinafter called the Appointed Date) and the SEZs that are de-notified or withdrawn after formal approval within a period of 6 months from the Appointed Date, shall be eligible to be developed as “Integrated Industrial Areas”.

Due to above provisions, some de-notified or withdrawn Special Economic Zones likely to be disqualified due to non-completion of the process till the appointment date. Therefore in order to achieve inherent intent of this policy, the matter of removing the relevant criteria for the said "Appointed date", was under consideration of the Government.

**Government Resolution :-**

Government is pleased to announce the policy to develop an integrated industrial area on the special economic zone established on the lands of state government or its Undertaking/ Maharashtra Industrial Development Corporation / CIDCO as follows:-

1. On the lands of State government or its undertakings/ MIDC/ CIDCO where Special Economic Zone (SEZ) is established land used pattern for development of Integrated Industrial Area was 60% for Industrial development and 40% for development of support activities.

   Based on DCR's of MIDC this will be changed for such lands for development of Integrated Industrial Area as minimum 80% for industrial development and maximum 20% for development of support activities.

2. A) Some of eligibility criteria have been set out regarding the policy of developing integrated industrial areas as mentioned in "Schedule-A" of Maharashtra Industrial Policy-2013.

   B) The Special Economic Zones (SEZs), that stand withdrawn or de-notified on the date of Notification u/s 37(IAA) of the MRTP Act 1966 that shall be published by the Govt. to incorporate the elements of this policy into the DCRs of the concerned Special Planning Authority, (hereinafter called the Appointed Date) and the SEZs that are de-notified or withdrawn after formal approval within a period of 6 months from the Appointed Date, shall be eligible to be developed as “Integrated Industrial Areas”.

   C) Due to above provisions, some de-notified or withdrawn Special Economic Zones likely to be disqualified due to non-completion of the process till the appointment date. Therefore, in order to achieve the inherent intent of this policy, the relevant criteria of "Appointed Date" is removed.

3. Stamp duty waiver is sanctioned in public interest as per section (9) of Bombay Stamp Act for 15% developed the lands to be transferred from Khed Economic Infrastructure Pvt. Ltd. (KEIPL) to the company of project affected farmer i.e. Khed Development Limited (KDL).

4. In-principle approval is accorded for formation of Integrated Industrial Area on parcel of denotified land of Khed Economic Infrastructure Pvt. Ltd. (KEIPL). The committee for Navi Mumbai Special Economic Zone (NMSEZ) under the chairmanship of the Hon'ble Chief Secretary will finalise the modalities for formation of Integrated Industrial Area for Khed Economic Infrastructure Pvt. Ltd. (KEIPL) also.

5. Based on this Government resolution all concerned departments will issue necessary order / GRs / Notifications in this regard.

*************